**राजीव गांधी निवारा योजना क्र १ व अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना** या दोन्ही योजनांतर्गत घरकुलांना सोयी सुविधा पुरविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्रामविकास व जलसंधारण विभाग
परिपत्रक क्र.इंआयो-२०१०/प्र.क्र. ४५४ व प्र.क्र.४५५ /यो-१०
मंत्रालय. क्रमांक-३२
दिनांक : २३ मार्च, २०११.

**परिपत्रक**

इंदिरा आवास योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेची मार्गदर्शक तत्वे केंद्र शासनाने निश्चित केलेली असून या मार्गदर्शक तत्वांनुसार इंदिरा आवास योजनेतील घरकुलांना शौचालय, निर्धुर चुल इत्यादी सुविधा पुरविण्यात येतात. इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर **राजीव गांधी निवारा योजना क्र १** व **अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना** या दोन्ही योजना प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, यांचे मार्फत जिल्हयात राबविण्यात येत आहेत.

२. ग्रामीण भागातील निवासी वस्तीमध्ये स्वच्छता राखण्यासाठी , तेथील मानवी जीवनाच्या चांगल्या आरोग्याकरिता व पोषक अशा पर्यावरणाची सोय करण्यासाठी इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर **राजीव गांधी निवारा योजना क्र १** व **अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल** या दोन्ही योजना मधील घरकुलांमध्ये शौचालय, निर्धुर चुल इत्यादि सुविधा पुरविण्यात याव्यात.

३. शौचालयासाठी अतिरिक्त निधी पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या संपूर्ण स्वच्छता अभियान (Total Sanitation Campaign) अंतर्गत उपलब्ध होणारा निधी या प्रयोजनासाठी प्राप्त करुन घ्यावा. तसेच निर्धुर चुलीसाठी घरकुलांकरिता उपलब्ध होणाऱ्या निधीतून खर्च करण्यात यावा. प्रत्येक आर्थिक वर्षासाठी जो पुरवठाधारक निश्चित करण्यात येतो त्याच्याकडून त्या वर्षासाठी निर्धारित केलेल्या दराने निर्धूर चूल खरेदी करण्यात यावी.

४. हे परिपत्रक गृहनिर्माण विभाग, अनौ. संदर्भ क्र. निरंक, दि. १ जानेवारी, २०११ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ७०३३, दिनांक १८ फेब्रुवारी, २०११ अन्वये दर्शविण्यात आलेल्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा **संगणक संकेतांक** २०११०३२३१६०६५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(र. ह. श्रावणपाटील)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,यांचे स्वीय सहाय्यक

प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग,यांचे स्वीय सहाय्यक
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
मुख्य कार्यकारी अधिकारी , महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (हुडको सेल)
गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व) मुंबई
विभागीय आयुक्त (सर्व)
उपायुक्त (विकास शाखा), सर्व
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद तथा अध्यक्ष , जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
अप्पर संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मीक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष